**अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सातारा या कार्यालयातील श्री.सत्यवान अरविंद चव्हाण, वाहन चालक यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.७६/प्रशासन-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १४ ऑक्टोबर, २०२१**

**संदर्भ :** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/ १६-ब दि.२७ नोव्हेंबर, २०२०

४) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०२१/ प्र.क्र.३१/ प्रशासन-१, दि.२६ एप्रिल, २०२१.

५) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा यांचे दि.१६ जून, २०२१ व दि.०२ ऑगस्ट, २०२१ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. २१ डिसेंबर, २०१९ मधील तरतुदीनुसार, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणा-या अधिकारी व कर्मचा-यांच्या संख्येइतकी, असे अधिकारी व कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत असतील त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत तसेच उपरोक्त नमूद सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयापूर्वी, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवामुक्त करण्यात आलेले अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा समाप्ती पूर्वी ते ज्या पदावर कार्यरत होते, त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करून त्यांना मानवतावादी दृष्टीकोनातून व प्रशासनाची होणारी अडचण दूर करण्यासाठी सर्व प्रशासकीय विभागांनी तात्पुरत्या स्वरूपात अकरा महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर नेमणूक देणेबाबत निर्देश देण्यात आले आहे.

तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. ३० जून, २०२० अन्वये सदर अधिसंख्य पदे निर्माण करण्याचे प्राधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, दि.२६ एप्रिल, २०२१ अन्वये श्री.सत्यवान अरविंद

चव्हाण, वाहन चालक यांच्याकरीता अधिसंख्य पद निर्माण करण्यात आले असून त्यांच्या सेवा दिनांक ०७ ऑगस्ट, २०२० पासून अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, पुणे यांच्या अंतर्गत वर्ग करण्यात आल्या आहेत. श्री.चव्हाण, वाहन चालक यांच्याकरीता निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदाची मुदत दि.०६ जुलै, २०२१ रोजी समाप्त झाली असल्याने त्यांना दि.०६ जुलै, २०२१ पासून पुढे मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आता या शासन निर्णयान्वये श्री.सत्यवान अरविंद चव्हाण, वाहन चालक, यांना दिनांक ०६ जुलै, २०२१ पासून दिनांक ०५ जून, २०२२ पर्यंत तात्पुरत्या स्वरूपात ११ महिन्यांकरिता किंवा सदर कर्मचारी सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. श्री.सत्यवान चव्हाण, वाहन चालक हे सद्य:स्थितीत अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असल्याने त्यांच्या वेतनावर होणारा खर्च त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९ व क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२० रोजीच्या तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. बीसीसी २०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२७ नोव्हेंबर, २०२० आणि सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.ईएसटी २०२१/प्र.क्र.३१/प्रशासन-१, दि.२६ एप्रिल, २०२१ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११०१४१७२०१२३११८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vikram Nivrutti Dhamal

Digitally signed by Vikram Nivrutti Dhamal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, serialNumber=10d36944a4b86eab516b1b70183709c5fb570cfdf5a52755adfef51ed380b836, cn=Vikram Nivrutti Dhamal
Date: 2021.10.14 17:23:05 +05'30'

**( वि.नि.ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**-१. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२.
२. सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३. प्र. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५. महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
७. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा.
८. संचालक, लेखा व कोषागारे, पुणे / सातारा
९. अधिदान व लेखा अधिकारी, वान्द्रे (पूर्व), मुंबई.
१०. कार्यासन सेवा-३ / सेवा-४ सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, (निवडनस्ती)